राज्य सेवा मुख्य परीक्षा सन २०१७ व २०१८ च्या तुकडीतील परिविक्षाधीन गट विकास अधिकारी गट-अ यांना पदस्थापना देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## ग्राम विकास विभाग

**शासन आदेश क्रमांकः मविसे-१०२०/प्र.क्र.१२/२०२०/आस्था-३अ**

बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ, मुंबई - ४०० ००१.

तारीख: २२ ऑक्टोंबर, २०२१.

**संदर्भ:-**१) ग्रामविकास विभाग,शासन निर्णय क्रमांक:मविसे-१०२०/प्र.क्र.१२/२०२०/आस्था-३अ, दिनांक १ जानेवारी,२०२१.

२) ग्रामविकास विभाग,शासन आदेश क्रमांक:मविसे-१०२१/प्र.क्र.९८/२०२१/आस्था-३, दिनांक ९ ऑगस्ट,२०२१.

**प्रस्तावना:**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून राज्यसेवा मुख्य परीक्षा सन २०१७ व २०१८ मधून सरळसेवेने नियुक्त होणाऱ्या महाराष्ट्र विकास सेवा,गट अ मधील परिविक्षाधीन गट विकास अधिकारी यांना संदर्भीय क्र.१ च्या शासन निर्णयान्वये स्वतंत्र कार्यभाराकरिता पदस्थापना देण्यात आली होती. तथापि, संदर्भीय क्र.२ च्या सर्वसाधारण बदली आदेशान्वये खालील नमूद परिविक्षाधीन अधिकाऱ्यांच्या जागी नियमित गट विकास अधिकारी यांना पदस्थापना देण्यात आल्यामुळे उक्त परिविक्षाधीन गट विकास अधिकारी पदस्थापने शिवाय झाले. सबब, उक्त परिविक्षाधीन अधिकाऱ्यांना पदस्थापना देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन आदेश :**

सार्वजनिक सेवेच्या हितार्थ महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतूदींनुसार पदस्थापना करण्यास सक्षम असलेल्या प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने खालील अधिकाऱ्यांच्या पदस्थापनेचे आदेश शासन देत आहे. संबंधित अधिकाऱ्यांची नियुक्ती त्यांच्या नावासमोरील स्तंभ क्र.४ मध्ये दर्शविलेल्या पदावर करण्यात येत आहे :-

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नाव | सीपीटीपी | पदस्थापनेचे पद व ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | श्री.देव हिराचंद घुनावत | सीपीटीपी-५ | गट विकास अधिकारी, पंचायत समिती, लोणार, जिल्हा परिषद, बुलढाणा. | रिक्तपदी |
| २ | श्री.केशव पाटीलबा पवार | सीपीटीपी-६ | गट विकास अधिकारी, पंचायत समिती, वरुड, जिल्हा परिषद, अमरावती. | रिक्तपदी |

२. उपरोक्त आदेशातील नमूद अधिकाऱ्यांनी त्यांच्या नवीन पदाचा पदभार त्वरीत स्वीकारावा. तसेच त्यांना नियमानुसार अनुज्ञेय असलेल्या पदग्रहण अवधीमध्ये पदस्थापनेच्या ठिकाणी रुजु व्हावे. अन्यथा या पदग्रहण अवधीच्या पदावर रुजु न झाल्यास, त्यांचा अनुपस्थितीचा कालावधी हा अकार्यदिन ( dies non ) म्हणून गणला जाईल, तसेच त्यांनी अनधिकृत रजेवर जाऊ नये. तसेच त्यांचे लक्ष, सामान्य प्रशासन विभागाच्या क्रमांक : सीडीआर१०८२/२५६७/२८/अकरा, दिनांक ३०.८.१९८२ च्या परिपत्रकाकडे वेधण्यात येत आहे. त्यात दिलेल्या सूचना लक्षात घेऊन पदस्थापना रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास, ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील याची त्यांनी नोंद घ्यावी.

३. उपरोक्त अधिकाऱ्यांनी नवीन नियुक्तीच्या ठिकाणी हजर व्हावे व पदभार स्विकारल्याचा दिनांक शासनास कळवावा. संबंधित अधिकारी हे विहित कालावधीत नियुक्तीच्या पदावर रुजू न झाल्यास संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी विभागीय आयुक्तांमार्फत शिस्तभंग विषयक कार्यवाहीचा प्रस्ताव शासनास सादर करावा.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११०२२१७०२१२३५२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pawar Sanjay Rajaram

Digitally signed by Pawar Sanjay Rajaram
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a00eeebdc51e1ffb7d6747ffbcbbba333cca001d95359cbb1a2217118b054a9e, serialNumber=65afd54f6450ab9da3327c361bfc1f5f92e629b78ed9a49381d3c9751f71254a, cn=Pawar Sanjay Rajaram
Date: 2021.10.22 17:21:58 +05'30'

( संजय पवार )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत-

१. मा. मंत्री ( ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव
२. मा. राज्यमंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव
३. अपर मुख्य सचिव (ग्राम विकास विभाग), ग्राम विकास विभाग,बांधकाम भवन,२५ मर्झबान पथ,मुंबई.
४. विभागीय आयुक्त,अमरावती.
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अमरावती/बुलढाणा.
६. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, अमरावती/बुलढाणा.
७. महालेखापाल १/२ (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
८. संबंधित अधिकारी (द्वारा संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद)
९. कार्यासन, आस्था-२, ग्राम विकास विभाग,बांधकाम भवन,२५ मर्झबान पथ,मुंबई.
१०. निवड नस्ती-आस्था ३अ .